महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नागरी
पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना
अनुदान वितरीत करण्याबाबत.
जळगांव महानगरपालिका, जिल्हा जळगांव.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१४/प्र.क्र. ३६/पापु-२२

जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: २१ नोव्हेंबर,२०१४.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८,**
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८,**
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०१२/प्र.क्र. १५४/पापु२२, दिनांक १५ मार्च, २०१२,**
४) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०१४/प्र.क्र.३६/पापु२२, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१४.**

**प्रस्तावना :-**

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दिष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी विहित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी नागरी स्थानिक संस्थानी भरलेल्या स्वहिश्याच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदान वितरीत करण्यात येते. जळगांव महानगरपालिका जि.जळगांव या नागरी संस्थेने स्वहिश्याची संपूर्ण रक्कम

रुपये १३६.८१ लक्ष इतकी रक्कम भरणा केली असल्याने राज्य शासनाकडून अनुज्ञेय असलेल्या अनुदानाचा दुसरा हप्ता रु.२२७.२० लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत जळगांव महानगरपालिका, जि.जळगांव येथील पाणीपुरवठा व मलनि:सारण योजनेस संदर्भिय अनुक्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली असून संबंधित नागरी स्थानिक संस्थेने त्यांनी भरावयाच्या रु.१३६.८१ लक्ष इतकी स्वहिश्याची संपूर्ण रक्कम बँकेत जमा केली असल्याने जळगांव महानगरपालिकेस अनुज्ञेय असलेल्या अनुदानातून १० टक्के रक्कम ( रु.३१.६८लाख ) राखीव ठेऊन अनुदानाचा दुसरा हप्ता रु.२२७.२० लक्ष (रु. दोन कोटी सत्तावीस लाख वीस हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.लाखात)

| अ. क्र. | शहराचे नाव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (७०%) | कर्ज हिश्श्याची रक्कम (२०%) | नागरी संस्थेने निकषानूसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासनाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १. | जळगांव महानगर पालिका,जि. जळगांव. | ४५२.६८ | ३१६.८८ | ९०.५३ | ४५.२७ | १३६.८१ | ५८.०० | २२७.२० |
| | | | | | | | **एकूण :** | **२२७.२०** |

२. सदर योजने अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना अनुज्ञेय होणा-या सदर अनुदाना वरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१,पाणीपुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य-राज्य योजना,(०२)(०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापूर,नवी मुंबई यांनी सदर लेखाशीर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमुद स्तंभ क्रमांक ८ मध्ये दर्शविल्या प्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेला अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावीत.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक संस्थेने शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२११६०९०१०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sule Vaishali M

Digitally signed by Sule Vaishali M
DN: CN = Sule Vaishali M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.11.21 16:45:57 +05'30'

**( वैशाली सुळे)**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१.मा.मंत्री, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव,
२.मा.राज्यमंत्री, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव,
३.प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
४.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
५.महालेखापाल- १ मुंबई/ नागपूर,
६.संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
७.विभागीय आयुक्त, नाशिक महसुल विभाग,
८.जिल्हाधिकारी, जळगांव,
९.मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,
१०. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
११. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१२. महापौर/ आयुक्त, जळगांव महानगरपालिका, जिल्हा जळगांव,
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव,
१४.जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका)जिल्हाधिकारी कार्यालय, जळगांव,
१५.वित्त विभाग/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.कक्ष अधिकारी, पापु-०४, पापु-२०, पापु-२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७.निवडनस्ती, पापु -२२, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.